**जलसंपदा विभागासाठी कालव्यावरील बांधकामे संकल्पन करणेसाठी संगणकीय प्रणाली विकसीत करण्यासाठी सनियंत्रण समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: ई-प्रशासन ईप्रमं २०१७ /(१८/१७)**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: ३१ /०५/२०१७

**संदर्भ:-** १. शासन निर्णय क्र. MIS १०९४ / (१५६/९४) MP (A), Dated: १०.०२.१९९५
२. शासन निर्णय क्र. MIS-२०१५/(CR. No.२५३/१५)/MP, Dated: १.०९.२०१५

**प्रस्तावना :-**

जलसंपदा विभागामध्ये, सध्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांना विविध योजनांतर्गत विहित कालावधीत सिंचन क्षमता निर्मितीचे उद्दिष्ट देण्यात आलेले आहे. बहुतांशी प्रकल्पांमध्ये धरण/मुख्य कालव्यांची कामे झाली असून पुढील वितरण प्रणालीची कामे शिल्लक आहेत.

कालव्याची संरेखा तयार करून, दि.१/९/२०१५ कालव्याच्या शासन निर्णयानुसार संकल्पन व त्यानंतर विविध प्रकारच्या बांधकामांचे संकल्पन, हि कामे मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना नाशिक अथवा प्रादेशिक स्तरावरील संकल्पचित्र पथकामार्फत केली जातात. छोट्या कामांची संकल्पचित्रे ही क्षेत्रिय स्तरावरच त्या-त्या विभागामार्फत केली जातात. या संकल्पनामध्ये कोणतीही सुसूत्रता नसून प्रदेश/महामंडळ निहाय संकल्पनामध्ये तफावत आढळून येत आहे. या सर्व प्रक्रियेला गती देण्यासाठी व कालवा संकल्पनामध्ये सुसूत्रता निर्माण करण्यासाठी, कालवा संरेखा संकल्पनासाठीच्या शासन निर्णय दि.१/०९/२०१५ च्या धर्तीवर मार्गदर्शक सुचना निर्गमित करणे आवश्यक आहे.

यापूर्वी,वाल्मी या संस्थेने संदर्भीय शासन निर्णय क्र.१ अन्वये कालवा संकल्पनासाठी संगणक प्रणाली (excel program) विकसित केलेली आहे. त्यामुळे, कालवा संकल्पनासाठीच्या संदर्भीय शासन निर्णय क्र.२ च्या मार्गदर्शक सुचनाप्रमाणे अस्तित्वातील excel base प्रणालीमध्ये सुधारणा करणे आवश्यक वाटते.

यामुळे राज्यस्तरावर संदर्भीय शासन निर्णय क्र.१ व २ च्या धर्तीवर मार्गदर्शक सुचनानुसार कालव्या वरील बांधकामाचे संकल्पन standardize करणेसाठी व त्यानुसार बांधकामांसाठी standard excel base templates विकसित करणेकरिता, सध्या क्षेत्रिय स्तरावर काम करणारे मु.अ./अ.अ. यांचे अध्यक्षतेखाली, सर्व महामंडळांतर्गत कार्यरत संकल्पचित्र विभागाचे का.अ. तसेच वाल्मी

संस्थेतील संबधित अधिकारी यांचा समावेश असणारी सनियंत्रण समिती स्थापन करण्याचे शासनाचे विचाराधीन होते. या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे आदेश निर्गमित करत आहे.

**शासन निर्णय :-**

१ घ.मी. / सेकंद पेक्षा कमी वाहन क्षमतेच्या कालव्यावरील बांधकामाच्या संकल्पनामध्ये एकसूत्रीपणा आणणेसाठी, विविध महामंडळांतर्गत प्रचलित संकल्पनाचा अभ्यास करून राज्यस्तरावर वापरण्यासाठी कालवा बांधकाम संकल्पचित्रांचे प्रमाणिकरण (standardization ) करणेसाठी समितीची स्थापना करण्यात येत आहे.या समितीची रचना पुढील प्रमाणे आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | श्री.प्रसाद नार्वेकर, अधीक्षक अभियंता,गो.उ.सिं. मंडळ, अंबाडी (भंडारा) | अध्यक्ष |
| २. | अधीक्षक अभियंता,का.सं.मं, मसंसं, नाशिक | सदस्य |
| ३. | श्री.अजय इंगळे, सहाय्यक प्राध्यापक,विज्ञान शाखा वाल्मी | सदस्य |
| ४. | श्री.हि.द.चांदेकर, कार्यकारी अभियंता,आंबोरा उ.सिं.वि. | सदस्य |
| ५. | कार्यकारी अभियंता,का.सं.वि. पुणे | सदस्य |
| ६. | कार्यकारी अभियंता,सं.वि.नवी मुंबई | सदस्य |
| ७. | कार्यकारी अभियंता,का.सं.वि. अमरावती | सदस्य |
| ८. | कार्यकारी अभियंता,सं.वि.नागपूर | सदस्य |
| ९. | कार्यकारी अभियंता, बां.व्य.सं.वि. पुणे | सदस्य सचिव |

**अ) समितीची कार्यकक्षा:**

१. क्षेत्रिय स्तरावर संकल्पन होणाऱ्या बांधकामांचे Canal structure design parameters standardise करणे.

२. प्रचलित कार्यपद्धती जशीच्या तशी न वापरता कार्यक्षम वापर होण्याच्या दृष्टीकोनातून, प्रणाली विकसित करताना प्रचलित शासन प्रक्रियेमधील काही तांत्रिक बदल करावयाचे असल्यास त्या अनुषंगाने शिफारस करणे.

३. MS Excel based standard design templates चा वापर करून क्षेत्रिय अधिकारी यांना संकल्पन व प्राकलने तयार करण्याचे कामात गतिमानता येणार असल्याने संदर्भिय शासन निर्णय क्र.२ वर आधारीत MS Excel based program विकसित करणे. प्रस्तुत समितीने प्रमाणिकरण (standardization) केलेल्या कालवा बांधकामांच्या संकल्पनासाठी शक्यतो वाल्मी संस्थेव्दारे MS

Excel based standard program विकसित करणेत यावेत. या बाबतची कार्यवाही अ.अ., का.सं.मं., नाशिक, यांच्या सहाय्याने ई-प्रशासन मंडळ यांनी करावी.

४. वरीलनुसार संगणकीकृत प्रणाली तयार करण्यास्तव templates उपलब्ध करुन देणे, संगणकीकृत प्रणालीची User Acceptance testing व स्वीकृतीच्या (operational/ final acceptance) टप्प्यावर सहाय्य करणे.

५. प्रशिक्षणाकरिता आवश्यक असलेले साहित्य व प्रशिक्षणाची पद्धत अंमलात आणणेसाठी सल्ला देणे आणि प्रशिक्षण साहित्याची पडताळणी करून देणे.

**ब) समितीची कार्यपद्धती व बैठका**

समितीचे अध्यक्ष यांचे निर्देशानुसार समितीची कार्यपद्धत निश्चित करण्यात यावी. तसेच समितीच्या बैठका अध्यक्षांच्या सूचनेनुसार आयोजित केल्या जाव्यात. समितीच्या बैठकीच्या कामकाजासाठी गणपूर्तीची अट असणार नाही.समितीच्या अध्यक्षांनी समितीने निश्चित केलेल्या कालमर्यादेनुसार कार्यवाही होत असल्याबाबत खातरजमा करावी.

**क) समितीचा कार्यकाळ**

समितीने स्थापना आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यात अहवाल सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०५३११४१३१०२३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sanjay Madhukar Belsare

Digitally signed by Sanjay Madhukar Belsare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=544e07f06fbab100dc2bfe33db79fc14350d78d6c16f8feab484d842c496717d, cn=Sanjay Madhukar Belsare
Date: 2017.05.31 14:18:30 +05'30'

**( श्री.संजय बेलसरे )**

अधीक्षक अभियंता व उपसचिव (निवस)

**प्रत :**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (जलसंपदा) मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
४) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
५) प्रधान सचिव, (जसं) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

६) सचिव, (जसंव्य व लाक्षेवि) जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई
७) सचिव, (प्रकल्प समन्वय ) जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई
८) महासंचालक, वाल्मी औरंगाबाद
९) महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण ,जलविज्ञान संशोधन व सुरक्षितता, नाशिक
१०) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
११) सर्व मुख्य अभियंता जलसंपदा विभाग.
१२) सर्व मा.मुख्य अभियंता व सहसचिव/ सहसचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) उपसचिव , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) उपसचिव (निवस), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) आंतरवित्त सल्लागार वउपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) सर्व अधीक्षक अभियंता जलसंपदा विभाग.
१७) सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.